**राज्यस्तरीय तुरुंग अधिकारी प्रशिक्षण महाविद्यालय, पुणे येथे वसतिगृह, किचन व डायनिंग हॉल, पाण्याची टाकी इ.चे बांधकाम करणे या कामाचे येणाऱ्या खर्चाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## गृह विभाग

## शासन निर्णय क्रमांकः जेएलएम-१०१६/प्र.क्र.२४६/तुरुंग-२

मंत्रालय, दुसरा मजला, मुख्य इमारत,
मादाम कामा मार्ग, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: २० मार्च, २०१७

**वाचा**

१) अपर पोलीस महासंचालक व कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य,पुणे यांचे पत्र क्र.बीएलडी/दौ.जा.तु.प्र.म./विविध कामे/९४३५/कक्ष-६(३), दिनांक.४.१०.२०१६.व दिनांक २१.११.२०१६

**प्रस्तावना**

राज्यस्तरीय तुरुंग अधिकारी प्रशिक्षण महाविद्यालय, पुणे येथे प्रशिक्षणार्थींसाठी वसतिगृह, किचन व डायनिंग हॉल १ लक्ष लिटरची पाण्याची टाकी व लोखंडी पत्र्याचा फोल्डींग किल्ला बांधकाम करणे या कामाचे उपविभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, पुणे यांनी एकत्रित रुपये ४४४.२७ लक्ष (अक्षरी रुपये चार कोटी चव्वेचाळीस लक्ष सत्तावीस हजार फक्त ) इतक्या खर्चाचे तपासून व साक्षांकीत केलेले अंदाजपत्रके अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी शासनाच्या प्रशासकीय मान्यतेसाठी सादर केली आहेत. त्यास अनुसरुन याद्वारे शासन खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे:-

**शासन निर्णय**

राज्यस्तरीय तुरुंग अधिकारी प्रशिक्षण महाविद्यालय, पुणे येथे प्रशिक्षणार्थींसाठी वसतिगृह, किचन व डायनिंग हॉल, १ लक्ष लिटरची पाण्याची टाकी व लोखंडी पत्र्याचा फोल्डींग किल्ला बांधकाम करणे अश्या खाली नमूद केलेल्या कामाचे छाननीअंती एकूण रुपये ५४३.२९ लक्ष (रुपये पाच कोटी त्रेचाळीस लक्ष एकोणतीस हजार फक्त) इतक्या अंदाजपत्रकास खालील अटींच्या अधीन राहून शासन प्रशासकीय मान्यता देत आहे:-

| अ.क्र | कामाचे नाव | अंदाजित खर्च |
|---|---|---|
| १. | दौजातुअप्रम, पुणे येथे प्रशिक्षणार्थीसाठी वसतीगृहाचे बांधकाम करणे. | रु.३७६.०६ लक्ष |
| २. | दौजातुअप्रम, पुणे येथे किचन व डायनिंग हॉलचे बांधकाम करणे. | रु. ९३.४४ लक्ष |
| ३. | दौजातुअप्रम, पुणे येथे १.०० लक्ष लिटर क्षमतेची असलेली टाकीचे बांधकाम करणे | रु. ७१.४७ लक्ष |
| ४. | दौजातुअप्रम, पुणे येथे लोखंडी पत्र्याचा फोल्डींग किल्ला बनविणे. | रु. २.३२ लक्ष |
| | एकुण रुपये:- | रु.५४३.२९ लक्ष |

१) काम सुरु करण्यापूर्वी नमुना नकाशा, मांडणी नकाशा तसेच विस्तृत नकाशास वास्तुविशारदांकडुन मंजूरी घेऊनच सुरु करावे.

२) काम सुरु करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची पूर्तता करुन घ्यावी.

३) ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतूदींबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रके मंजूर करुनच काम हाती घ्यावे.

४) सदर कामाचा खर्च कारागृह विभागाच्या उपलब्ध असलेल्या नियतव्ययामध्ये समाविष्ट करता येणे शक्य आहे याची खातरजमा करण्यात यावी.

५) अंदाजपत्रक अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, पुणे यांचे कार्यालयाकडुन तपासून घ्यावे.

२. सदरचे अंदाजपत्रक सन २०१६-१७ च्या दरसूचीवर आधारित असुन, होणाऱ्या जिल्हा दरसूचीतील वाढीसाठी १० टक्के रकमेची तरतूद करण्यात आली आहे. सदर अंदाजपत्रकात अंतर्गत विद्युतिकरणासाठी ११ टक्के, पाणीपुरवठा व मलनि:स्सारणासाठी ५ टक्के, सेंटेंज चार्जेससाठी ५ टक्के, आकस्मिक खर्चासाठी ४ टक्के, अंतर्गत रस्त्यांसाठी, पार्कीग व्यवस्थेसाठी ठोक तरतूदी समाविष्ट करण्यात आल्या आहेत.

३. यासाठी होणारा खर्च केंद्र पुरस्कृत योजनेतंर्गत पालघर जिल्हा कारागृहासाठी केंद्र शासनाकडुन प्राप्त रुपये ५.०० कोटी निधीपैकी अखर्चित राहिलेल्या निधीतून भागविण्यात यावा. या कामाचे अंदाजपत्रकास केंद्र शासनाने मान्यता प्रदान केल्यानंतरच या बाबीवरील खर्च करण्यात यावा.

४. हा शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सहमतीने व वित्त विभाग शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दि.१७.०४.२०१५ अन्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उप विभाग-पाच,अनुक्रमांक-३, नियम १३४ अन्वये प्रशासनिक विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३२०१६५७०७८९२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prabhakar Atmaram Sankhe

Digitally signed by Prabhakar Atmaram Sankhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=16ca9b273a3e790c4aab4c479015f44d506ae481c2dc55f48d889691ffa9939a, cn=Prabhakar Atmaram Sankhe
Date: 2017.03.20 17:00:56 +05'30'

**( प्रभाकर संखे )**
कक्ष अधिकारी, गृह विभाग

**प्रत,**

१. अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य,पुणे,
२. कारागृह उपमहानिरीक्षक (मुख्यालय),महाराष्ट्र राज्य,पुणे,
३. कारागृह उपमहानिरीक्षक (पश्चिम विभाग), पुणे,
४. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र राज्य, मुंबई,
५. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा परिक्षा),महाराष्ट्र राज्य, मुंबई,
६. अधिक्षक, ठाणे मध्यवर्ती कारागृह, ठाणे.
७. प्राचार्य, दौलतराव जाधव तुरुंग अधिकारी प्रशिक्षण महाविद्यालय,येरवडा, पुणे.
८. कोषागार अधिकारी, ठाणे,/पुणे,
९. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, पुणे,
१०. सार्वजनिक बांधकाम विभाग, (इमारती-२) मंत्रालय,मुंबई-३२,
११. अवर सचिव (बीयुडी-१), गृह विभाग, मंत्रालय,मुंबई-३२,
१२.निवडनस्ती, (तुरुंग-२)